ग्रामीण रुग्णालय सोनपेठ, जिल्हा परभणी येथील रुग्णालयाकरीता वैद्यकीय अधिक्षक, वर्ग-१ यांना "कार्यालय प्रमुख" आणि "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संविअ-२०२०/ प्र.क्र.१५९/ आरोग्य-४**

मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.

**तारीख : २४ नोव्हेंबर, २०२०.**

वाचा:-

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पदनि-२०१८/प्र.क्र.१८५/आरोग्य-४, दि.०६.०६.२०१९.**

२) **सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-३/टे.२/ग्रारु सोनपेठ/आह.वसंवि/५५२२-२४/२०, दि.२८.०७.२०२०.**

**प्रस्तावना** :-

ग्रामीण रुग्णालय सोनपेठ, जिल्हा परभणी या ३० खाटांच्या ग्रामीण रुग्णालयाकरीता उपरोक्त क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये २५ अधिकारी व कर्मचाऱ्यांची पदे निर्माण करण्यात आली आहेत. या अनुषंगाने ग्रामीण रुग्णालय सोनपेठ, जिल्हा परभणी येथील रुग्णालयाचे कार्यालयीन कामकाज व आर्थिक व्यवहार हाताळण्यासाठी वैद्यकीय अधिक्षक, वर्ग-१, यांना "कार्यालय प्रमुख" आणि "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

ग्रामीण रुग्णालय सोनपेठ, जिल्हा परभणी रुग्णालयाचे कार्यालयीन कामकाज व आर्थिक व्यवहार हाताळण्यासाठी, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ च्या सोबतच्या परिशिष्टामधील, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग- पहिला, उप विभाग- पहिला, अनुक्रमांक्र ३ येथील नियम २ अन्वये प्रदान केलेल्या प्राधिकारास अनुसरुन "वैद्यकीय अधिक्षक, वर्ग-१" यांना "कार्यालय प्रमुख" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्र.१५६ मधील तरतूदीनुसार वैद्यकीय अधिक्षक, वर्ग-१, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.१८७/२०२०/कोषा. प्रशा-५, दि.२८.०८.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१८१६४९२२९२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2020.11.24 16:12:52 +05'30'

प्र मो बलकवडे
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२. संचालक आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा, पुणे.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
४. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा),आरोग्य सेवा, पुणे.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी.
८. ग्रामीण रुग्णालय सोनपेठ, जिल्हा परभणी.
९. जिल्हा शल्य चिकित्सक, परभणी.
१०.महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई/ नागपूर.
११.वित्त विभाग (विनियम कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती (आरोग्य-४).